एकात्मिक बाल विकास सेवा योजनेतंर्गत पोषण अभियानाची राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी राज्य अभिसरण समिती गठीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महिला व बाल विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०१८/प्र.क्र.३३३/का.६**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ४ ऑक्टोबर, २०१८

वाचा : - महिला व बाल विकास विभाग,शा.नि.क्र.एबावि-२०१८/प्र.क्र.२७/का.६, दिनांक ११ जुलै २०१८

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाकडुन पोषण अभियानाची देशातील सर्व राज्यांमध्ये टप्प्या-टप्प्याने अंमलबजावणी करण्यात येणार आहे. केंद्र शासनाने जागतिक बँकेच्या सहाय्याने अंमलात आणलेला (ISSNIP) कार्यक्रमाचा पोषण अभियाना मध्ये अंतर्भाव करुन त्याची राज्यात अंमलबजावणी करण्यास मान्यता दिलेली आहे. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.NNM/७/२०१७-WBP दि. १८ डिसेंबर २०१७ अन्वये सन २०१७-१८ व २०१८-१९ यावर्षात फेज १ व २ अंतर्गत राज्यातील ३० जिल्हयांतील ४४४ प्रकल्पांमधील ८५४५२ अंगणवाडी केंद्रामध्ये राष्ट्रीय पोषण मिशन राबविण्यास केंद्र शासनाने प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे. तथापी, केंद्र शासनाचे पत्र क्र. No.NNM/६१/२०१८, CPMU, दिनांक २५ मे २०१८ अन्वये राष्ट्रीय पोषण मिशन चे नांव बदलून पोषण अभियान नामकरण करण्यात आलेले आहे. पोषण अभियाना अंतर्गत समाविष्ट असलेल्या फेज- I व फेज- II जिल्हयांमध्ये पोषण अभियान कार्यक्रमाची अंमलबजावणी सन २०१८-१९ मध्ये करण्यास व उर्वरीत ६ जिल्हयांमध्ये पोषण अभियानाची अंमलबजावणी सन २०१९-२० मध्ये करण्यास दिनांक ११ जुलै २०१८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली आहे.

२. पोषण अभियान हा मा.प्रधानमंत्री यांचा देशातील समग्र पोषणावर आधारित महत्व पुर्ण कार्यक्रम महिला व बाल विकास विभागाच्या एकात्मिक बाल विकास सेवा योजनेमार्फत राबविण्यात येत आहे. राज्यात पोषण अभियान या कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यात येत आहे. या पोषण अभियाना अंतर्गत खालील उदिष्टये साध्य करण्याचे निर्धारीत करण्यात आलेले आहे.

१. ० ते ६ वयोगटाच्या बालकांमधील खुजे/बुटकेपणाचे तसेच कुपोषणाचे प्रमाण कमी करणे.
२. ६ ते ५९ महिने वयोगटामधील बालकांमध्ये रक्ताल्पता याचे प्रमाण कमी करणे.
३. १५-४९ वर्षे वयोगटामधील किशोरवयीन मुली/महिला यांचेमधील रक्ताल्पता कमी करणे.
४. जन्मत: कमी वजनाचे असणाऱ्या बालकांचे प्रमाण कमी करणे.

४. पोषण अभियानाचे संनियंत्रण करणेसाठी राष्ट्रीय स्तरावर परिषदेची स्थापना करण्यात आली असून त्यामार्फत राष्ट्रीय स्तरावरील विविध विभागांमध्ये समन्वय व वेळोवेळी आढावा घेण्यात येणार आहे. तसेच राष्ट्रीय परिषद दर ६ महिन्यांनी मा. पंतप्रधान यांना अहवाल सादर करणार आहेत. या पोषण

अभियानाची राष्ट्रीय स्तरावरुन अंमलबजावणी करण्यासाठी मा.सचिव, महिला व बाल विकास विभाग मंत्रालय, नवी दिल्ली यांचे अध्यक्षतेखाली कार्यकारी समितीचे गठन करण्यात आलेले आहे. तसेच पोषण अभियानाचे वेळोवेळी संनियंत्रण व मुल्यमापन निती आयोगामार्फत करण्यात येणार आहे. पोषण अभियानाची राज्यस्तरावर अंमलबजावणी करण्यासाठी तसेच पोषण अभियानाचे उद्दिष्ट साध्य करणेसाठी राज्यस्तरावर राज्य अभिसरण समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

पोषण अभियानाची राज्यस्तरावर अंमलबजावणी करण्यासाठी तसेच पोषण अभियानाचे उद्दिष्ट साध्य करणेसाठी राज्यस्तरावर खालीलप्रमाणे राज्य अभिसरण समिती गठीत करण्यास शासन मंजूरी देत आहे.

**राज्य अभिसरण समिती**

| अ.क्र. | पदनाम व विभाग | समितीवरील पद |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव,नियोजन विभाग | **अध्यक्ष** |
| २ | अपर मुख्य सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ३ | अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण विभाग | सदस्य |
| ४ | अपर मुख्य सचिव ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य |
| ५ | प्रधान सचिव ,सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ६ | प्रधान सचिव ,अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग | सदस्य |
| ७ | प्रधान सचिव-२ , नगर विकास विभाग | सदस्य |
| ८ | सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ),ग्राम विकास व जलसंधारण विभाग | सदस्य |
| ९ | सचिव ,महिला व बाल विकास विभाग | सदस्य |
| १० | महासंचालक ( माहिती व प्रसिध्दी) माहिती व प्रसिध्दी विभाग | सदस्य |
| ११ | आयुक्त,अन्न व औषध प्रशासन,मुंबई | सदस्य |
| १२ | राज्य मिशन संचालक, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य मिशन | सदस्य |
| १३ | महासंचालक, राजमाता जिजाऊ माता - बाल आरोग्य व पोषण मिशन,मुंबई | सदस्य |
| १४ | खाद्य व पोषाहार मंडळाचे प्रतिनिधी | सदस्य |
| १५ | निपसीड या प्रशिक्षण संस्थेचे राज्य प्रतिनिधी | सदस्य |
| १६ | प्राचार्य, मध्यम स्तर प्रशिक्षण केंद्र | सदस्य |
| १७ | आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, | सदस्य सचिव |

राज्य अभिसरण समितीपुढे सर्व जिल्हयांमार्फत प्राप्त अभिसरण आरखडयांचे एकत्रिकरण करुन राज्यस्तरीय अभिसरण आराखडा तयार करुन त्यास मान्यता देण्याचे प्रस्ताव सादर करण्यात यावेत. तसेच वेळोवेळी पोषण अभियान कार्यक्रमाचा आढावा घेण्यासाठी राज्य अभिसरण समितीची बैठक दर तीन महिन्यांनी किंवा आवश्यकतेनुसार आयोजित करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००५१५२०४७१०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, serialNumber=4ca059ab7b8d64aaf749fe58e0a714a015f521cb28fd2204e49a4d81f12a5745, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2018.10.05 15:23:06 +05'30'

**( ला.रा.गुजर )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
५. अपर मुख्य सचिव ,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
६. अपर मुख्य सचिव , वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
७. अपर मुख्य सचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई
८. अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
९. प्रधान सचिव ( वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१०. प्रधान सचिव-२,नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
११. प्रधान सचिव ,सार्वजनिक आरोग्य विभाग,मंत्रालय,मुंबई
१२. प्रधान सचिव,अन्न नागरी पुरवठा विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. सचिव,महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१५. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई
१६. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
१७. आयुक्त,अन्न व औषध प्रशासन ,मुंबई
१८. महासंचालक,माहिती व प्रसिध्दी,मंत्रालय,मुंबई
१९. सर्व विभागीय आयुक्त
२०. सर्व जिल्हाधिकारी
२१. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
२२. सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
२३. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास विभाग
२४. सर्व महिला व बाल विकास अधिकारी (जिल्हापरिषद)
२५. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी )
२६. सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका,
२७. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२८. महासंचालक, राजमाता जिजाऊ माताबाल आरोग्य व पोषण मिशन-,मुंबई
२९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३०. निवड नस्ती (कार्यासन ६)